महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय, क्रमांक - विअप्र-१०.०५/प्र.क्र.४०/०५/विनियम
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २ सप्टेंबर, २००५

संदर्भ :- १) वित्त विभाग, अर्धशासकीय पत्र क्रमांक - विअप्र-१०८९/(४८)विअनि/भाग-२/कोषागारे-६, दिनांक ५ मे, १९८९

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-विअप्र-१०९५/प्र.क्र.९/९५/विनियम,दिनांक ८.१.१९९६ व दिनांक ८.२.१९९६ चे शुध्दीपत्रक

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक - विअप्र-१०९९/प्र.क्र.४७/९९/विनियम, दिनांक १.२.२०००

राज्य शासनाच्या वित्तीय अधिकारांचे प्रदान करण्यासंबंधीच्या प्रस्तावांवर चर्चा करुन तत्संबंधी निर्णय घेण्यासाठी दिनांक ८ जानेवारी १९९६ च्या परिपत्रकान्वये स्थापन केलेल्या वित्तीय अधिकार प्रदान समितीची पुनर्रचना करण्यात येत असून सदर समिती खालीलप्रमाणे स्थापन करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (वित्त) / प्रधान सचिव (वित्त) | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव / सचिव (माहिती तंत्रज्ञान व प्रशासकीय सुधारणा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ३. | संबंधित प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव | सहयोगी सदस्य |
| ४. | प्रधान सचिव (सुधारणा) / सचिव (सुधारणा) | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव / सचिव (व्यय) | सदस्य सचिव |

२. मंत्रालय प्रशासकीय विभागांकडून राज्य शासनाचे वित्तीय अधिकार प्रदान करण्यासंदर्भात आवश्यक त्या सर्व तपशीलासहित प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर वित्त विभागाच्या विनियम कार्यासनाने तत्संबंधीची तपासणी करुन तदनंतर समितीचे अध्यक्ष, अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / वित्त यांच्या मान्यतेनुसार समितीच्या बैठका आयोजित करुन सदर बैठकीमधील चर्चा - निर्णयानुसार बैठकीची कार्यवृत्ते तयार करुन संबंधीत सर्व अधिकारी / कार्यालयांना निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर समिती स्थायी स्वरुपात स्थापन करण्यात येत असून अनुक्रमांक - ३ येथे नमूद केलेले अधिकारी विभागपरत्वे आपोआपच बदलले जातील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( विनोद कुलकर्णी )
शासनाचे उप सचिव

D:\DEPARTMENTS\G.A.D\D.O.FP40.05